एकाच सेवेमधील आंतरश्रेणी पदोन्नतीसंबंधी.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक :एस.आर.व्ही.-१०८०/५१/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ मे, १९८०.

वाचा : शासन परिपत्रक, राजकीय व सेवा विभाग, क्रमांक: पीएससी-१०५६,
दिनांक २७.३.५६.

शासन परिपत्रक

राजकीय व सेवा विभागाच्या क्रमांक :पीएससी-१०५६, दिनांक २७.३.५६ च्या शासन परिपत्रकामध्ये एकाच सेवेच्या वर्गातील सामान्य राज्य सेवा [General State Service ] व्यतिरिक्त "आंतरश्रेणी पदोन्नत्या" [ Intergrade promotions within the same service] या भारतीय संविधानाच्या कलम ३२० [३][ब] मध्ये अंतर्भूत होत नसल्यामुळे अशा स्वरूपाच्या पदोन्नत्या लोकसेवा आयोगाच्या कक्षेतून वगळण्यात आलेल्या आहेत. म्हणून त्यासंबंधी आयोगाशी विचारविनिमय करण्याची आवश्यकता नाही असे स्पष्टीकरण करण्यात आलेले आहे.

२. वरीलप्रमाणे सूचना असतांनासुध्दा यथोचितरित्या प्रस्थापित केलेल्या [duly constituted ] सेवांमधील त्याच सेवेतील आंतरश्रेणी पदांवर करण्यात आलेल्या पदोन्नत्या संबंधीही लोकसेवा आयोगाकडे संदर्भ कांही मंत्रालयीन विभागांकडून करण्यात येतात असे निदर्शनास आलेले आहे. यथोचितरित्या प्रस्थापित करण्यात आलेल्या आणि त्याच सेवेमधील आंतरश्रेणी पदांवर करण्यात आलेल्या पदोन्नत्यासंबंधी लोकसेवा आयोगाकडे संदर्भ करण्याची आवश्यकता नाही. लोकसेवा आयोगाशी असा अनावश्यक पत्रव्यवहार केला जाणार नाही याबाबत मंत्रालयातील सर्व विभागांनी दक्षता घ्यावी.

३. तथापि, वर उल्लेखिलेल्या दिनांक २७.३.५६ च्या परिपत्रकांतील आदेश सामान्य राज्य सेवांमधील [ General State Civil Service ] एकाच वर्गातील आंतरश्रेणी पदोन्नतींना लागू नाहीत. जर पदोन्नत्या सामान्य राज्य सेवांमधील असतील तर त्यासंबंधी आयोगाकडे संदर्भ सर्व विभागांनी करावा.

राज्यपालांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
[ व.अं.कोटेश्वर ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग [पत्राने].